सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात महात्मा फुले कृषि विद्यापीठास ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान वितरीत करण्याबाबत.... (कार्यक्रम)

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मफुवि-३७२३/प्र. क्र.११२/७-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ ऑगस्ट, २०२३.

**वाचा :-** वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.

**प्रस्तावना:-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रकानुसार सन २०२३-२४ मधील प्रथम सहामाहीकरीता कार्यक्रमखर्चासाठी अर्थसंकल्पीत निधीच्या ४०% इतक्या मर्यादेत निधी वितरणास मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता, मागणी क्र. डी-३, ०१, पीक संवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(०६) महात्मा फुले कृषि विद्यापीठास सहायक अनुदान (कार्यक्रम) २४१५ ००७२, या लेखाशीर्षांतर्गत **३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान** या बाबीकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून पुढीलप्रमाणे एकूण रु. ९,००,००,००० /- (अक्षरी रुपये नऊ कोटी फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशील पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु.लाखात)

| अ.क्र. | योजना व उद्दीष्ट | सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत तरतूद | योजनेंतर्गत येणारे महाविद्यालय | प्रशासकीय मान्यता शासन निर्णय क्र. व दिनांक | वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या विद्यापीठास सहायक अनुदान (कार्यक्रम) २४१५ ००७२ ३५-भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान | ३०००.०० | मौजे काष्टी, ता. मालेगाव, जि.नाशिक येथील कृषि विज्ञान संकुलातील महाविद्यालयाचे बांधकाम | मफुवि-१४२१/ प्र.क्र.१४१/७अे, दि.१०.१२.२०२१ | ९००.०० |
| **एकूण (अक्षरी रु.नऊ कोटी फक्त)** | | | | | **९००.००** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

३) वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) ज्या योजनांतर्गत योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

५) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सूत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच,विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मूल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

६) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच,महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

७) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम,१९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम,१९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता,१९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तीचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. याप्रित्यर्थचा खर्च सन २०२३-२४ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. उपविभागीय कृषि अधिकारी, राहुरी, या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान,शासन निर्णय क्रमांक कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर १९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि-२००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१),१९७७ मधील,परिच्छेद १४२ व १४४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ

क्र.३२१/का.१४३१, दि.०३.७.२०२३ तसेच,वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१८९/२०२३/व्यय-१, दि.११.७.२०२३ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०८१११११५६२१९५०१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2023.08.11 11:57:56 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
२. अपर मुख्य सचिव, कृषि व पदुम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
३. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
४. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर,
५. वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
६. उपविभागीय कृषि अधिकारी, राहुरी, जिल्हा अहमदनगर,
७. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर / उपकोषागार अधिकारी, राहुरी, जिल्हा अहमदनगर,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
१०.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
११.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१२.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१३.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१४.कक्ष अधिकारी, कार्यासन ६अे /२अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१५.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.